**मुख्य अभियंता (स्थापत्य) बदलीने पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक : टिएफएस-१३१७/प्र.क्र.२७/१/सेवा-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ जून, २०१७

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. यू.पी.देबडवार, मुख्य अभियंता, नागपूर महानगरपालिका, नागपूर यांची पदस्थापना सार्वजनिक सेवेच्या हितार्थ तसेच प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. मुख्य अभियंता, नागपूर महानगरपालिका, नागपूर या पदावर अन्य अधिकाऱ्याची स्वतंत्रपणे नेमणूक करण्यात येईल.

३. श्री. देबडवार यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, श्री. देबडवार यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

५. श्री. देबडवार यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

६. श्री.देबडवार यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०११३२९१२८११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b989f11a955bd12836202040b21122502b1ac600cf24865b3b7d7169e14596c4, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2017.06.01 13:35:31 +05'30'

**( मृ.सं.देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर,
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर/ विशेष प्रकल्प, मुंबई/राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
५. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
८. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
१०. महालेखापाल-२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१२. श्री. यू.पी.देबडवार, मुख्य अभियंता, नागपूर महानगरपालिका, नागपूर,
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१७. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१८. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१९. सर्व सहसचिव / उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. कार्यासन आस्था-१ /३, रोखशाखा, सेवा-६ संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवडनस्ती.